**म्हाडाच्या गोरेगाव सिध्दार्थ नगर (पत्राचाळ) सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या प्रलंबित पुनर्विकासाबाबत उपाययोजना सूचविण्यासाठी नेमलेल्या समितीस मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृहनिर्माण विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- बैठक-२०१६/प्र.क.०४/गृनिप**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२
दिनांक:-१२ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा:-** १) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.वाटप २०१८/प्र.क्र.१४३/गृनिप, दि.२८.३.२०१८
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.बैठक २०१६/प्र.क्र.०४/गृनिप, दि.१६.१.२०२०.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाच्या (म्हाडा) अखत्यारितील गोरेगाव (पश्चिम), मुंबई येथील सिध्दार्थ नगर सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या (पत्राचाळ) पुनर्विकासाच्या अनुषंगाने सदर चाळींतील सुमारे ६७२ मूळ रहिवाशी अद्याप पुनर्वसन सदनिकांच्या प्रतिक्षेत आहेत. त्याचप्रमाणे संबंधित विकासकाकडून सदर रहिवाशांना अनेक महिन्यांपासून भाडे सुध्दा देण्यात येत नाही, अशा स्वरुपाच्या तक्रारी आहेत. तसेच सदर प्रकरण मा.उच्च न्यायालयात न्यायप्रविष्ठ असल्याने पुनर्विकासाची प्रक्रिया लांबणीवर पडली आहे. त्याचप्रमाणे म्हाडाला प्राप्त होणाऱ्या हिश्शावर बांधण्यात आलेल्या ३०६ सदनिकांची सोडत म्हाडाने २ वर्षापुर्वीच काढली आहे. मात्र, सदर सदनिकांचे वितरण संबंधितांना अद्याप करण्यात आलेले नाही. त्यानुषंगाने वाचा येथील शासन निर्णय, दिनांक १६.१.२०२० अन्वये, पुढील १५ दिवसांमध्ये उपाययोजना सुचविण्यासाठी श्री.जॉनी जोसेफ, सेवानिवृत्त मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली एक सदस्यीय समिती नियुक्त करण्यात आली आहे. तथापि, सदरहू समितीचा अहवाल अद्यापही अप्राप्त आहे. सदरहू समितीकडे संबंधितांनी त्यांचे म्हणणे सादर करण्यासंदर्भात मुदतवाढ मागीतलेली आहे. त्यानुषंगाने सदरहू समितीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

गोरेगाव, मुंबई येथील पत्राचाळ वसाहतीमधील सिध्दार्थ नगर सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या पुनर्विकास प्रकल्पासंदर्भात उपाययोजना सुचविण्यासाठी वाचा येथील दिनांक १६.०१.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये, श्री.जॉनी जोसेफ, सेवानिवृत्त मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या एक सदस्यीय समितीस त्यांचा अहवाल सादर करण्यास आणखी १५ दिवसांची मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००२१३१२५३४२०६०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Bharose M U

Digitally signed by Bharose M U
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f3abf3ab8b16dfec487f18ce64d6b0ab8e38d8925d44d15f7dbd61babb4ae6df, serialNumber=8b015b0d7afaa0db7c0603c5c954e6816492dbb5f94ab286da7f224853a4eebf, cn=Bharose M U
Date: 2020.02.13 12:54:04 +05'30'

**( मुं. उ. भरोसे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. राज्यमंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) श्री.जॉनी जोसेफ, सेवानिवृत्त मुख्य सचिव, मुंबई
५) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, (म्हाडा) गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई
६) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई
७) सर्व उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
८) निवड नस्ती (गृनिप), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई

* * * * * * * * * * * *